प्रश्न टाकून त्याचे उत्तर नकारात्मक दिलेले आहे. दीड शतकानंतर शिवाजीने उत्पन्न केलेले राज्य गेले आणि अठराशे-अठरा साली पेशव्याचा पराभव झाल्यावर घराकडे फिरणाऱ्या सैन्याला जनतेने संत्रस्त केले असे मनरो नावाच्या इतिहासकाराचे म्हणणे आहे आणि त्या एका सद्गृहस्थाच्या म्हणण्यावरून शिवाजीमहाराज हे राष्ट्रनिर्माते नव्हते असे प्रो. सरकार सिद्ध करू पाहात आहेत. वादविवादाकरिता वरील सर्व म्हणणे जरी खरे धरले तरी काय सिद्ध होते? केवळ स्थापन केलेले राज्य लवकर बुडाले म्हणून काय त्यांनी राष्ट्र निर्माण नाही केले? मराठ्याच्या पंचवीस वर्षांच्या स्वातंत्र्ययुद्धात राजारामाचे वेळी जी चिकाटी, जे धाडस, जी अपूर्व राष्ट्रभक्ती दिसून आली ती काय शिवाजीने राष्ट्र निर्माण केले नसते तर दिसून आली असती? आपल्या वतनावर पाणी सोडण्यात जर राष्ट्रीय दृष्टी नसती तर काय खंडो बल्लाळ सिद्ध झाले असते? राष्ट्रीय दृष्टी नसती तर काय संताजी घोरपडे, धनाजी जाधव, परसोजी भोसले, पानसंबळ आणि इतर अनेक शत शत तरूण महाराष्ट्रवीर लोखंडाचे चणे खाता खाता रक्त सांडीत सांडीत स्वातंत्र्यसमर चालवू शकले असते? एक फितुरीचे कृत्य जरी केले असते, तरी मोगलांनी कोणत्याही क्षुद्र पाईकाला नाईक केले असते आणि नाईकाला सरदार बनविले असते; परंतु या सर्व पारतंत्र्याच्या वैभवावर लाथ मारून सबंध जन्मभर रानावनातून वणवण करीत महाराष्ट्राचे दोन लाख वीरसैन्य पंचवीस वर्षेपर्यंत झगडत, मारीत, मरत हिंडले असते? आपापसामध्ये चुरशीने लढणारे धनाजी-संताजी मुसलमानांचे सैन्य येताच जर राष्ट्रीय वृत्ती नसती तर काय एकत्र होऊन नि वैर विसरून जाऊन मुसलमानांशी लढले असते? इतकेच कशाला, परंतु मनरोसाहेब ज्या शेवटच्या पेशव्यांच्या दिवसांबद्दल गोष्ट बोलतो त्याच दहाबारा वर्षांच्या आगेमागे भागानगरच्या निजामाच्या दरबारात असलेल्या गोविंदपंत काळे या राष्ट्रभक्त वकिलाचे नाना-महादजींचा समेट झाल्यावर नानांना आलेले अत्यंत मार्मिक आणि देशभक्तीने ओतप्रोत भरलेले पत्र मनरोसाहेबांनी वाचले का? त्यांनी जरी वाचले नसले तरी श्री. यदुनाथ सरकारनी तरी ते वाचले असेल ना? पर्शियन ग्रंथकारावरून नि मोगली उर्दू दप्तरातील बाडांतूनच काय ती ज्यांनी मराठ्यांच्या इतिहासाची भूमिका अभ्यासिली असे पूर्वग्रहदूषित, अहंकारविमूढ नि मराठी इतिहासाचे हृद्गत न समजणारे श्री. यदुनाथ या पत्राचा जरा शांतपणे विचार कशाला करतील? मनरो काय म्हणतो तेच तेवढे त्यांचे वेदवाक्य! पुन्हा दीडशे वर्षेपर्यंत शिवाजीने प्रचलित केलेल्या हिंदवी साम्राज्याच्या ध्येयाने महाराष्ट्रवीर जे लढले तो दीडशे वर्षांचा काळ काय अगदी अत्यल्प झाला? मग ह्याच विधानानुसार गेल्या महायुद्धात कंबर मोडलेले जर्मनीचे राष्ट्र ज्याच्या प्रयत्नाने एक संघटित साम्राज्य झाले होते त्या प्रिन्स बिस्मार्कलाही केवळ दीडशे वर्षे तर राहो, पण शंभर वर्षे सुद्धा त्याची संघटना टिकली नाही म्हणून राष्ट्रपित्याच्या टिपणीतून काढून टाकावे लागेल. अजरामर राज्य असे कोणाचेच टिकले नाही--म्हणून राष्ट्रनिर्माता असा

जगात कोणीच झाला नाही म्हणावयाचा? समर्थ आणि शिवाजी ह्यांनीच महाराष्ट्रास व्यक्तिमत्त्वाची जाणीव दिली, एकजीव केले. 'एकराट्' केले

**या भूमंडळाचे ठायी।**
**हिंदु ऐसा उरला नाही।।**
**मराठा तितुका मेळवावा।**
**आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा।।**
**ये विषी न करता तकवा।**
**पूर्वज हासती।।**

ही हाक सह्याद्रीच्या शिखरावरून रामदासाने पुकारली. शिवाजीने शपथ घेतली ती 'हिंदवी (हिंदूंचे) राज्य स्थापण्याची! 'तुम्ही हिंदु आम्ही हिंदु' म्हणून शिवाजीनेच जयसिंगाला सांगितले. विस्कळीत महाराष्ट्रांतली 'रत्ने वेचून वेचून त्यांची माळ गुंफली'. 'दिल्ली द्रपदलिप्सवः' ची सैन्ये दिल्लीच्या रोखे चालू लागली. रामदास-शिवाजीच्या पिढीचेच हे सारे शब्द आहेत. रामदास शिवाजीच्या ह्या स्फूर्तीनेच मराठ्यांच्या तीन पिढ्या लढत राहिल्या. 'अरे पाहता काय? हिंदुपदपादशाहीचा दिवस उजाडला 'म्हणून गर्जत बाजीरावाने दिल्लीचे दरवाजे तोडले. भाऊने दिल्लीचे तख्त फोडले. भीमथडीचे घोडे सिंधूचे पाणी प्याले! विजयी भगवा झेंडा अटकेवर फडकावला!! असले राष्ट्रीय उत्थान अर्वाचीन हिंदु इतिहासात महाराष्ट्राबाहेर कुठे दिसले का? राष्ट्र निर्माण करणे ते हेच. हेच शिवाजीने केले; पण ते 'SIR' यदुनाथांना काय कळणार? शूर मर्दाचा पोवाडा। शूर मर्दाने गावा!' मुर्दाडाने नव्हे!

प्रा. महाशयांनी हिंदु समाजातील जाति-उपजातीचे अवडंबर माजवून तो अप्रस्तुत विषय ह्या वादात घुसडून देण्याचे धाष्टर्य करावे हे पाहून कोणासही विषाद वाटेल; परंतु ह्या जाति-उपजातीचे लोढणे गळ्यात असतानाच श्रीशिवाजी महाराजांनी प्रत्येक जाति आणि उपजातीकडून देशाधर्माच्या नावाने हिंदुपदपादशाही-साठी पिढ्यानुपिढ्या पराक्रम गाजविला तो काय राष्ट्रीय वृत्तीची प्रेरणा केल्यावाचून? शिवाजी राष्ट्रनिर्माता होता ह्याचे हेच तर उत्कृष्ट प्रत्यंतर आहे.

शिवरायाने केवळ राजकीय दृष्ट्यांच आपल्या राष्ट्राचे पुनरुज्जीवन केले असे नाही, तर सामाजिक उदारता दाखवून बदलत्या काळाप्रमाणे रूढीला बदलून आपली परंपरा अविकृत ठेवण्याची जी तत्परता दाखविली ती पाहून आजच्या सुधारकालासुद्धा खाली मान घालावी लागेल. बजाजी निंबाळकरासारखा अभिजात सरदार काही लालुचीला, काही छळाला बळी पडून मुसलमान झाला असता, हिंदु धर्माच्या वर्धिष्णु, सर्वसंग्राहक नि सर्वपाचक स्वरूपाकडे लक्ष देऊन शिवाजीने आज अजूनही ज्या नावाला काही अतिशहाणे दचकतात, ती शुद्धीची प्रथा सक्रिय सुरू केली. बजाजी निंबाळकरास शुद्ध केले; इतकेच नव्हे तर त्या

कुळात स्वतःच्या कुळातील मुलगी देऊन त्याला हिंदु समाजात पचवून टाकले. त्याचप्रमाणे नेताजी पालकर ह्यालाही महाराजांनी शुद्ध करून पुनरपि हिंदु करून घेतले होते. अशा रीतीने त्यांनी हिंदुसंघटन नि शुद्धि ह्या दोन अमूल्य संजीवनी त्याही वेळेला उपयोगात आणल्या होत्या.

ज्याप्रमाणे राजकीय आणि सामाजिक उत्थानाला शिवाजीने चैतन्य दिले होते, त्याचप्रमाणे राष्ट्राला प्राणाप्रमाणे असलेले वाङ्मयही त्यांनी उत्तेजित केले होते. त्या वेळी उर्दू भाषेने मराठी भाषेला जवळजवळ खग्रास ग्रहण लावीत आणले होते आणि जर शिवाजीने भाषाशुद्धीचा प्रयत्न करून मराठी भाषेला संस्कृतातून नवजीवन दिले नसते, तर आज मराठी भाषा कुठल्या कुठे विकृत झाली असती. परंतु त्यांनी 'राज्यव्यवहारकोश' करवून आणि उर्दू शब्द काढून टाकण्याची प्रवृत्ती वाढवून मराठी भाषेची मोठी सेवा केली. कवींना, ग्रंथकारांना उत्तेजन देणे ही राष्ट्रोद्धाराचीच कामे समजून शिवरायांनी तीही पार पाडली. भूषण ह्या नावाचा उत्तर हिंदुस्थानचा सुप्रसिद्ध राष्ट्रीय कवी शिवाजीने काही वर्षे आपल्या आश्रयास ठेवला होता नि त्याच्याकडून स्वतःच्या चरित्रावर सुंदर ग्रंथ सिद्ध करविला होता. त्याप्रमाणे पंडित परमानंदांचे, गागाभट्टांचे आणि अनेक संस्कृत पंडितांचे स्वागत करुन त्यांना यथान्याय नि यथायोग्य आश्रय देऊन गुणिजनांना आणि विद्वानांना आणि संस्कृत विद्येला त्याने उत्तेजन दिले.

मनुष्याचा उत्सवप्रिय असलेला स्वभाव जाणून शिवरायाने गतस्वातंत्र्याचे पुनरुज्जीवन नि हिंदुपदपादशाहीचे पुण्याहवाचन रायगडाच्या पुण्यभूमीवर सिंहासनारोहणाचा समारंभ घडवून आणून केले. अनेक शतकेपर्यंत हिंदुस्थानच्या दैवी, उभी असलेली हिंदु सिंहासने खचून गेलेली पाहण्याचे होते. राजमुकूट हिंदूंच्या हातात येत होते; परंतु ते परक्यांच्या मस्तकाला भूषित करण्याकरिता काय ते! छत्रचामरे ते पाहत होते; परंतु ती स्वतःच्या हातांनी परक्यांच्या मस्तकांवर ढाळावी लागत होती! आणि हाय! हे असे हृदयविदारक दृश्य एक नव्हे, दोन नव्हे, सतत पाचशे वर्षे हिंदु जातीच्या ललाटी लिहिले होते; परंतु शेवटी शिवाजीने मनु पालटविला. त्याने हिंदु जातीच्या इतिहासातील आणखी एक अद्भुत रोमहर्षक प्रसंग गागाभट्टाच्या हस्ते स्वतःला विधियुक्त राज्याभिषेक करवून घेऊन घडवून आणला.

धन्य तो दिवस, की ज्या दिवशी शिवनेरीच्या पडक्या दुर्गात जन्मास आलेले, तोरणागडावर अडखळणारे, एक यत्किंश्चित भासले जाणारे उनाड पोर अखिल हिंदु राज्याचे स्वामी झाले. हिंदु जातीचे भाग्य पुनरपि उदयाला आले. हिंदु हे नाव जगात जिवंत उरले.

तो धन्य दिवस हाच! --हिंदुपदपादशाह शिवछत्रपतींना आज राज्याभिषेक होत आहे! या पुण्यसरितांनो, आपल्या पवित्र जलांनी आपली पात्रे भरभरून रायगडच्या राजवाड्याकडे

या! आणि या हिंदु छत्रपतीवर राज्याभिषेक करा! पश्चिम समुद्र नि पूर्व समुद्र हे तुझे दोन्ही बाहू उभारून, हे हिंदुमहासागरा, तुझ्या कोषागारांतील अशेष रत्नामोत्यांची उपायने ह्या हिंदुपदपादशहाच्या चरणांवर अर्पण कर!

ह्या इतिहास घडविणाऱ्या दिवसाला आज ठीक तीनशे वर्षे झाली आणि या तीनशे वर्षांच्या अवधीनंतर हे हिंदुस्थान ह्या राष्ट्रवीराला उचित असा आपला कृतज्ञतेचा करभार सादर करीत आहे. त्या थोरामोठ्यांच्या करभारात हा माझाही कृतज्ञ पुरस्कार, शिवभूपते! तू स्वीकार आणि इतकेच 'पसायदान' दे की, तुझी दिव्यस्फूर्ती आम्हा सांप्रत हतबल बनलेल्या हिंदु जातीच्या अंगात संचरित व्हावी आणि तू तीनशे वर्षांपूर्वी हिंदु राष्ट्राचे, हिंदु धर्माचे आणि हिंदु जातीचे जसे पुनरुज्जीवन केलेस तसेच आजही करावयासाठी तुझ्याप्रमाणे आम्हालाही सामर्थ्य यावे!!

'श्रद्धानंद', मुंबई- ५ मे १९२७

* * *

# शिवरायांच्या यशस्वी राजनीतीचे एक सूत्र

कातर्यं केवला नितीः शौर्यं श्वापदचेष्टितम्।
अतः सिद्धिसमेताभ्यामुभाभ्यामन्वियेष सः।।

महाराज अगदी लहान होते. आठ एक वर्षांचे सुद्धा नसतील. तेव्हापासून आपल्या धर्माची नि जातीची अवनति पाहून त्यांचे हृदय तळमळत असावे. तेव्हापासून या अवनतीच्या प्रतिकारार्थ मी काय करू शकेन याचे विचार त्यांचे चित्तात घोळत असत. तेव्हापासून माझ्या राष्ट्राच्या नि माझ्या धर्माच्या गौरवासाठी, स्वातंत्र्यासाठी, सामर्थ्यासाठी मी आपला प्राणही देईन ही प्रतिज्ञा ते करीत असावे. त्यांच्या त्या चिमुकल्या मस्तकात 'हिंदवी स्वराज्या'च्या प्रचंड कल्पना नि मनोहर स्वप्ने उदय पावत, विस्तार पावत, प्रसार पावत; एखाद्या विद्युत् प्रवाहासारखी त्यांच्या संगतीत राहणाऱ्या बालकांच्या, तरुणांच्या इतकेच नव्हे तर वृद्धांच्याही अंगात संचार करू लागत.

स्वदेशाच्या नि स्वधर्माच्या स्वातंत्र्यासाठी प्राणही अर्पण करण्याचा निश्चय केला खरा. पण प्राण स्वातंत्र्यार्थ द्यावयाचे म्हणजे कसे द्यावयाचे? समोर प्रथम दिसेल त्या मुसलमानी तटाच्या भिंतीवर डोके फोडून? वा जे प्रथम वाटेत भेटेल त्या मुसलमानी

राजद्वाराशी धरणे धरून-उपास करून-दे माझे स्वातंत्र्य परत, आण तो माझ्या राष्ट्राचा राजमुकूट इकडे, नाही तर हे आम्ही सर्व मावळे, मराठे, ब्राह्मण तुझ्या घरात उपास करून मरतो! असे म्हणून विजापूरच्या नि औरंगजेबाच्या दारात वा वेशीत प्रायोपवेशन करून?

हे उपाय अनेक लोकांनी करून पाहिले होते. अनेक वेळा मोगल बादशहांनी त्यांस भीक घातली नव्हती. एकदा प्रत्यक्ष दिल्लीतसुद्धा ही गंमत होऊन चुकली होती. हिंदूंना शक्य त्या उपायांनी बाटविण्याचा नि त्यांचेवर करांचे जड ओझे अधिकाअधिक लादण्याचा औरंगजेबाचा प्रयत्न जेव्हा सर्व हिंदूंस त्राही त्राही करविता झाल, तेव्हा एकदा शेकडो हिंदी पुढाऱ्यांनी दिल्लीस जमून आपली कागाळी प्रत्यक्ष औरंगजेबाचे कानावर घालावी नि त्या पीडेचा अंत होईपर्यंत तेथून हलूही नये असा निश्चय करून दिल्लीस प्रयाण केले. आपण प्रजा, तो राजा. आपण जर त्याचे दाराशी न्याय मागावयास गेलो नि न्याय दे, नाही तर आम्ही या आमच्यातील अनेक ब्राह्मणांसह तुझ्या दाराशी धरणे धरून बसतो. मग तू आम्हास लाथा मार, बुक्या मार, काय वाटेल ते कर असे म्हटले नि वर्तले असता बादशहास दया आलीच पाहिजे, आत्मबलाने तो जिकला गेलाच पाहिजे असे भाबडेपणे समजून ते सहस्त्रो लोक दिल्लीच्या राजवाड्याभोवती गोळा होऊ लागले. तो शुक्रवारचा दिवस असल्याने बादशहा औरंगजेब मशिदीत जावयाचा होता. बादशहाची स्वारी सिद्ध झाली. हजारो घोडा थयथयाटत स्वारीपुढे रांगांनी उभा राहिला. सहस्त्रो घोडेस्वार झकझकणाऱ्या तरवारी, भाले, बंदुका पेलीत त्या अश्वांवर ऐटीने स्वार झाले. मध्ये प्रचंड हत्तीवरच्या उंच अंबारीत औरंगजेब बसून एखाद्या दुष्प्राप्य दानवासारखा दिसू लागला. ती स्वारी थोडी पुढे सरकते तो ते धरणे धरावयास आलेले सहस्त्रो हिंदु 'न्याय द्या! महाराज, न्याय द्या! 'म्हणून ओरडत ओरडत स्वारीच्या मार्गावर आडवे झाले. त्यास भालदार शिपाई दूर करू लागले, ते हटेनात. हिंदूंवर होत असलेले अत्याचार नि लादले जाणारे अन्याय्य कर दूर झाल्याविना आम्ही हलणार नाही अशी एकच ओरड झाली. औरंगजेब क्षणभर उभा राहिला. लोकांस वाटले शेवटी निःशस्त्र प्रतिकाराने डाव जिंकला, दगडासही पाझर फुटला. दयेने आग्निही थंड झाला. इतक्यात एक मुल्ला म्हणाला, निमाजाचा वेळ अगदी सन्निघ आला आहे! अधिक थांबल्यास प्रार्थना अधर्म्य होईल. औरंगजेब म्हणाला, 'चालवा हत्ती पुढे!' ते सहस्त्रो हिंदु म्हणाले, 'मायबाप! आमचे म्हणणे ऐकावे, मग पुढे जावे'. औरंगजेब म्हणाला, 'त्यास मार्ग सोडून उभे करा' रक्षक म्हणाले, 'ते मार्ग सोडून जात नाहीत, ते मार्गावर आडवे पडले आहेत!'

'बरे तर, त्यांच्यावरूनच हत्ती चालवा!!' औरंगजेब म्हणाला.

तरीही ते त्रस्त हिंदु, आपण मार्गावर आडवे पडलो आहोत, आता सागर तरून राम जाऊ शकेल. पण ह्या सर्व दिल्लीच्या मार्गावर उपाशी-तापाशी पालथ्या पडलेल्या आमच्या

आत्मबळास उल्लंघून हा औरंगजेब कसा जाऊ शकणार? अशा विश्वस्त धैर्यांने तसेच मार्गावर पडून राहिले तोच त्या स्वारीतील औरंगजेबाच्या आज्ञेने चवताळलेले अश्व, हत्ती उंट नि पदाती अल्ला हो अकबरची गर्जना करीत तिळभरही न डगमगता त्या माणसांच्या फरशीवरून थयथयाटत घुसले! त्यांस चेंदीत-मेंदीत पार निघून गेले! मऊ पायघडीवर पाय टेकण्यास जितका अल्प अडथळा होतो तितक्याही अडथळ्याविना बादशहाची स्वारी मशिदीत जाऊन पोचली. तो राजमार्ग चेंदामेंदा झालेल्या हिंदु रक्तमांसांनी चिणून गेला.

तेव्हा पूर्वीच्या असल्या अनुभवास पाहून नि ऐकून आलेला एक गोसावी महाराष्ट्रातील सह्याद्रीच्या एका शिखरावर उभा राहून गर्जलाः- 'देशार्थ, धर्मार्थ राष्ट्रार्थ प्राण द्यावयाचा निश्चित जो मार्ग तो असा नाही.

**'पुण्यात्मा आणि पापात्मा। दोहीकडे अंतरात्मा।**
**परंतु साधु भोंदु सीमा। सांडूच नये।।**
**हे धकाधकीची कामे। तीक्ष्ण बुद्धिची वर्मे।**
**मोठ्या भावार्थ संभ्रमे। कैसे घडे।।**
**धटासी आणावा धट। उद्धटासी पाहिजे उद्धट।**
**खटनटासी खटनट। अवश्य करी।।**
**धर्मासाठी मरावे। मरोनि अवघ्यांसी मारावे।**
**मारिता मारिता घ्यावे। राज्य आपुले।।**
**हे धूर्तपणाची कामे। राजकारण करावे नेमे।**
**ढिलेपणाच्या संभ्रमे। जाऊचि नये।।**

महाराजांच्या चित्तात हा उपदेश पूर्णपणे ठसला. केवळ शौर्याने नव्हे नि केवळ कातर्याने नव्हे, केवळ दंडेलिने नव्हे नि केवळ नरमाईने नव्हे, तर जिथे जसा प्रसंग पडेल तिथे तसे वागून आपले मुख्य ध्येय - आपले मुख्य अवतारकार्य- साधावयाचे, हा त्यांनी निश्चय केला. त्यांनी निश्चय केला की

**साप विखारी देशजननिचा ये घेऊ चावा।**
**अवचित गाठुनि ठकवुनि भुलवुनि कसाही ठेचावा।।**

महाराज लहानपणी शिकलेले त्यांच्या राजनीतीचे हे मुख्य सूत्र प्रौढवयीही कधी विसरले नाहीत. ते विजापुरास आपल्या पित्यासह गेले होते, तेव्हा त्या यवनी बादशहास पाहून दिपून जाण्याचे स्थली त्यांचा सात्त्विक कोप भडकून उठला. त्यांचे पाय एखाद्या लोहस्तंभाप्रमाणे ताठ झाले. ते कुर्निसात करण्यासाठी काही केल्या लवेनात. त्याचप्रमाणे विजापूरच्या दरबारात गाईची होत असलेली हत्या पाहून त्यांनी स्वतः एका मुसलमानास छाटून काढले. त्यांनी अफझुलखानाची मगरमिठी पडताच त्या प्रचंड दैत्यास अचाट साहस करून पोटात वाघनखे खुपसून खाली लोळविले! भर मध्यरात्री शाहिस्तेखानाच्या प्रत्यक्ष

राजवाड्यात शिरुन त्याच्या सहस्त्रो सैनिकांचे भर गोटात त्यावर वार चढविला नि हा हा म्हणता पुन्हा जसेच्या तसे निसटून सिंहगड पाठीशी घातला. असली अचाट कर्मे करणारा शिवाजी भ्याड होता असे समजण्यास वा सांगण्यास कोणाची छाती आहे? प्रत्यक्ष रामदासांना या त्यांच्या अचाट साहसाची, कहातीपणाची, जिवाविषयीच्या निष्काळजीपणाची भिती पडून

**'मोहरा पेटला अभिमाना। मग तो जीवाकडे पाहेना।।'**

**हे काही ठिक नाही असे शिवाजीस सांगावे लागले.**

**'धुरेने युद्धास जाणे। ऐसी नव्हेत की राजकारणे।**

**धुराच करुन सोडणे। कित्येक लोक।।'**

**अशी चेतावणी द्यावी लागली.**

प्रतापाचा नि साहसाचा असा हा केवळ सूर्य असताही जेव्हा ते साहस वा तो प्रताप आपल्या अंगीकृत राष्ट्रस्वातंत्र्याचे विरुद्ध जाऊ पाही नि जेव्हा स्वीकृत महत्कार्याचे यशास्तव शौर्याचे स्थली शहाणपणा, शक्तीचे स्थली युक्ती नि तेजाचे स्थली थिल्लरपणा अधिक उपयुक्त दिसला तेथे तेच शिवाजीराजे असे वाकून घेत की, तेवढेच स्थली ज्यांनी त्यास पाहिले वा त्यांचे तेवढेच कृत्य ज्यांनी ऐकले अशा कित्येक क्षुद्र मनुष्यांनीही म्हणू लागावे की, शिवाजीहून मी किती तरी शूर मनुष्य आहे; हा केवढा भित्रा!

जावळीच्या विस्तीर्ण मंडपात जेव्हा विजापूरचा पराक्रमी, तेजस्वी नि दैत्यासारखा धिप्पाड सेनापती अफझुलखान मिशावर ताव देत बसला होता, जेव्हा त्यांचे प्रचंड सैन्य शेजारीच मैल मैल पसरले होते, जेव्हा त्याच्या केसास धक्का लागताच शेकडो तोफा धुव्वा उडवून देण्यास गुरगुरत होत्या. तेव्हा या मंडपात रुमालाने हात बांधलेला, 'मला शस्त्राचे भय वाटते, कृपा करुन आपण मला सडेच भेटावे' म्हणून थरथरत कापत म्हणणारा, ठेंगणा, दचकत् पाय टेकणारा, विजापूरच्या अपराधांची सेवकास क्षमा असावी अशी याचना करणारा नि मी माझे शिर कृतकर्मांची क्षमा मागून आपले पायी ठेवतो म्हणून अफझुलखानापुढे गयावया करणारा एक अगदी थिल्लरसा मनुष्य त्या मंडपात शिरला, तो शिवाजी होता. त्याच्या त्या वेळच्या मुद्रेवरून, शब्दावरून नि वर्तनावरून पहाणारास असेच वाटले की, त्याहून भित्रा मनुष्य या जगात कोण आहे?

तो अफझुलखानासमोर आला, अफझुल्लखानाने त्यास सहज बगलेत दाबले-जसे आपण सहज एखाद्या हरिणाची मान बगलेत दाबतो. तो काय झाले? तरवार चमकली. पोटात वाघनखे घुसली. तो धिप्पाड खान ची ची करीत अंकुशघाताने ची ची करणाऱ्या एखाद्या हत्तीसारखा कोलमडू लागला. पट्ट्यास पट्टा, खंजिरास खंजीर, तोफेस तोफ भिडली! खान ठार झाला! खानाची फौज ठार झाली, उधळली गेली. शिर छाटून, पोट फोडून, गोट लुटून शिवाजी एखाद्या सिंहासारखा गड चढू लागला! देवीचा सूड घेतला,

देवाचा सूड घेतला. शत्रूचा बारा सहस्त्र घोडा पाडाव करुन बांधून टाकला. एका क्षणापूर्वी या जगातील अत्यंत भित्र्या मनुष्यासारख्या दिसणाऱ्या त्या शिवाजीहून आता या जगात अधिक शूर, दिप्तीमान् नि साहसी कोण? त्या वेळी तो थिल्लर दिसला म्हणूनच या वेळेस त्याच्या मुद्रेवरील त्या दिग्विजयी दीप्तीवर कोणाची दृष्टि ठरत नाही. त्या मंडपात शिरतेवेळी तो मान अवनत करून शिरला म्हणूनच आता तो त्या मंडपातून विजयाचे पाठीवरील उन्नत अंबारीत बसून मान ताठ करुन बाहेर येत आहे!

पुढे जयसिंग आला. पुन्हा ध्येयासाठी नम्रता स्वीकारून त्याच्याशी संधिकरणे भाग पडले. घेतलेले गड दिले, बादशहाविरुद्ध केलेल्या बंडाची क्षमा मागितली, पत्करू नये ती त्याची नोकरीही पत्करली नि बादशहास पत्र लिहिले--

'मी शिवाजी, आपला गुन्हेगार नि अपराधी आहे. आपणास शरण येऊन जीव नि धनदौलत रक्षण करण्याची इच्छा धारण करीत आहे. अतःपर मी आपली नोकरी इमानाने बजाविण्यास सदैव तत्पर राहीन आणि आपली आज्ञा पाळण्यास भूषण मानीन. बंडाळी करून मी आपल्या सर्वस्वाचा घात कधीही करून घेणार नाही. मला सर्व अपराधाची क्षमा करून जीवदान द्यावे एवढेच या दासाचे आपणापाशी मागणे आहे.'

हे पत्र नि खाली दिलेले मूलपत्र यदुनाथ सरकारने प्रसिद्ध केले नि त्याचा आपल्या बखरीतून उल्लेखही आलेला आहे. हे पत्र जाताच धूर्त औरंगजेबाने पानावर पान ठेवून शिवाजीस क्षमादानाचे पत्र, पोशाख नि आज्ञा धाडली. ते कळताच 'मुसलमानी धर्मरक्षक' शिवाजी त्या आज्ञेचे सत्कारार्थ सहा मैल पायी चालून सामोरा गेला! नि पुन्हा प्रत्युत्तर लिहिता झाला:

'बादशाही ठसा नि पंजा यांनी अलंकृत झालेली आपली कृपापूर्ण आज्ञा येऊन पावली. ह्यायोगे बादशहांनी मला जीवदान दिले आहे. या पापी दासाचे अपराध क्षमेस पात्र नसताही बादशहांनी केवळ उदार अंतःकरणाने कृपा केली हे त्यांस मोठे भूषण आहे. मी आज्ञेप्रमाणे विजापूरकरांवरही चालून जाऊन नि त्या युद्धात विशेष पराक्रम गाजवून पूर्वीचा काळिमा धुऊन काढीन. आपल्या अनंत उपकारांची फेड अंशतः तरी करीन.'

या 'मुसलमानी धर्मरक्षक' शिवाजीने पुढे मुसलमानी धर्मांचे 'गोब्राह्मण प्रतिपालक' छत्र उभारून किती संरक्षण केले नि 'तुमची नोकरी इमानाने पाळीन म्हणून वचन देणाऱ्या या ऐंद्रजालिकाने त्या औरंगजेबाची चाकरी पुढे कशी बजाविली हे इतिहास-प्रसिद्ध आहे!

पण शिवरायांच्या कृत्यांचा पुढचा इतिहास ज्यांच्या अंधळ्या डोळ्यांना दिसू शकला नाही किंवा त्या वीरसिंहाच्या मागच्या अनंत धाडसाची, अपूर्व साहसाची नि दीप्ततम तेजाची दिप्ती नि स्मृति ज्यांच्या थिल्लर नि कृतघ्न मनात राहू शकली नव्हती अशा तत्कालीन बायाबापड्यांनी एकच कोल्हेकुई करण्यास आरंभ केला. अफझुलखानाकडे नुसत्या पाहण्यानेही ज्यांची गाळण उडाली असती, आजन्म मुसलमानांपुढे कुरनिसात

करता करता ज्यांच्या गुडग्यांस घट्टे पडले होते नि विजापूरच्या नि दिल्लीच्या मार्गातून गाआींच्या कसाअखान्यांसमोरुन चालताना मुसलमान रागावतील या भयाने नाकास पदर लावून चालण्याचेही साहस ज्यांनी केले नाही असले भ्याड, देशशत्रूच्या नोकराणीचे नोकर तेही नाक मुरडून म्हणाले, की, 'छी, भ्याला लेकाचा! असली पत्रे धाडण्यापेक्षा शिवाजी मेला असता तर पत्करले असते!'

मूर्खानो! विजापूरच्या भर मार्गात गोवधाने चिडून मुसलमान कसायाचा लहानपणीच शिरच्छेद करणारा, अफझुलखानाचा हंता, शाहिस्त्याचा शास्ता, रामदासांचा पट्टशिष्य, अखिल हिंदुराष्ट्राची मूर्तिमंत महत्त्वाकांक्षा असलेला हा 'भित्रा' शिवाजी तुमच्यासारखा गुलामगिरीच्या नरकात पिचणाऱ्या लाखो वीर्यशाली' कीटकांपेक्षा जर अधिक भित्रा होता आणि तुम्ही जर आपणाला एवढे वीर्यशाली समजता तर तुम्ही का या धर्मयुद्धात नि स्वातंत्र्ययुद्धात त्याच्याहून अधिक शूरतेने लढत नाही? शाहिस्त्याला पिटाळून नि पाच शाह्यांस रगडून मग एक पत्र शिवाजीने लिहिणे नि तेही एवढ्यासाठी की, त्यायोगे रगडलेल्या पाच शाहीस नि उरलेल्या या मुख्य बादशाहीसही पिसून पिसून मातीला मिळविता यावे म्हणून! तुम्ही जेव्हा शाहिस्त्याला माराल नि पाच पादशाह्या रगडाल आणि तरीही भित्रे पत्र लिहिणार नाही तेव्हा कुठे तुमच्या या बालिश बडबडीचे समर्थन क्षणभर कोणी श्रवण तरी करील. तोपर्यंत हा एक शिवाजी मेला असता तर बरे असे म्हणण्याचे स्थली स्वदेशासाठी रक्ताचा एक थेंबही ज्यांनी सांडिला नाही, शत्रूचे जे जन्माचे मिंधे, जे शत्रूवर धर्मयुद्धांत हात उगारणे तर दूरच; पण दुसरे कोणी उगारू लागताच, गर्जू लागणाऱ्या शत्रूच्या क्रोधाच्या डुरकाण्या ऐकतानाही सकंप, दार लावून आत चुलीपाशी जाऊन बांगड्या भरून लपून बसतात नि जे तिथे मात्र शिवाजीच्या भित्रेपणाला हसतात अशा तुमच्यासारख्या लाख बायाबापड्या मेल्या तरी चिंता नाही असेच इतिहास गर्जत राहणार!

इतक्यात 'मुसलमानी धर्मरक्षक' शिवाजीस बादशहाने पत्र लिहिले.

'भेटीस या म्हणजे बादशाही कृपा संपादन कराल!' महाराजांनी युक्तीने मूग गिळून भेटीस जाण्याचे ठरविले. तो औरंगजेबाने दरबारात पाच हजारी स्वारात शिवाजीला उभे केले. पाच हजारी स्वारांत शिवाजीला! की, ज्याने अखिल भारताचे सिंहासनावर आपला अधिकार सांगितला-त्याला उभे केले. अंतर्गत तेज उसळून बाहेर येऊ लागले, मुद्रा लाल झाली, रागाने पुटपुटत महाराज काही वाकडेतिकडे शब्दही पुटपुटत गेले; पण त्वरित त्या क्रोधाच्या तरवारीस तितिक्षेच्या कोशात तसेच बळेच दाबून शिवाजीराजे नेमून दिलेल्या घरी गेले तो ते घर तुरुंग झाला नि औरंगजेबाचे सशस्त्र पहारे उभे राहिले. त्या वेळेस आपल्या अंगीकृत कार्याकडे जावयास, हिंदुस्वातंत्र्यश्रीच्या भावी राजमंदिरात घुसावयास एक लहानशी दिंडी काय ती उघडी होती; पण तीतून मान अगदी खाली घालून, गर्वाचा

ताठा अगदी नाहीसा करून, अवमानाच्या आकुंचनात अंगे अगदी दडपून टाकून गेले तरच क्वचित् त्या दिंडीतून निसटून पुढे जाण्याचा संभव होता. जर तिथे शिवाजी म्हणता, मी मान लववायचा नाही! मी हिंदु स्वातंत्र्याचा ध्वज! मी जीव गेला तरी लवणार नाही, तर ते कृत्य जरी निंदनीय झाले नसते तरी अभिनंदनीयही झाले नसते. तेव्हा ताठपणा नव्हे तर आकुंचनच अभिनंदनीय! पण निष्फळ नव्हे तर अभिनंदनीय असूनही सफळ होणारे होते. म्हणून महाराजांनी त्या दिंडीतूनच हिंदु राज्यश्रीच्या मंदिराकडे जाण्याचा निश्चय केला. जो पहारेकरी येईल त्याची स्तुति केली. कोणास पेटाऱ्यातून मेवा धाडला. मी 'मुसलमानी धर्मरक्षक शिवाजी. मी कधीही बादशहाशी वैर करणार नाही. मी गरीब आहे. मी अपराधी आहे!' इत्यादी निरोप त्यांनी मुसलमानी सरदारांस धाडले नि एक दिवस त्या पेटाऱ्यातील पेढे, मिठाई नि अफू खाऊन गुंग झालेल्या सरदारांचे हातावर तुरी देऊन महाराज त्यांचे हातून निसटून गेले! ज्या वेळेस ते एका पेटाऱ्यात अंगे आवळून वर भूस खाली भूस, वर मिठाई खाली मेवे असे एखाद्या पिंजऱ्यात पडलेल्या उंदरासारखे बसले होते, त्या वेळेस ते तसेच पहारेकऱ्यास सापडते तर औरंगजेब मोठ्याने हसून निश्चित म्हणाला असता, 'बेशक यह बेशरम एक पहाडका चुवा है! कैसा चुवेके माफक छिपता है, देखो!' पण त्यावेळी उंदरासारखे होणे हेच खरे शौर्य होते. त्या वेळेस सिंहासारखी गर्जना करणे ही शौर्याची केवळ विटंबना मात्र झाली असती!

थोडाच वेळ निघून गेला. महाराज सुरक्षित रायगडला आले आणि मग सिंहगर्जनेची खरी वेळ आली! दऱ्या डोंगरातून तोफेने अशी गर्जना केली. तो महाराष्ट्राचा सिंहनाद ऐकून पूर्वी ज्यास तुच्छतेने औरंगजेब 'उंदीर' म्हणत होता त्यासच 'सैतान' असे त्रासाने म्हणू लागला.

थोडेच दिवसात रायगडावर हिंदुपदपादशाहीची मुहूर्तमेढ रोवून, हिंदुश्रीचा स्वातंत्र्यध्वज उभारून हिंदु सिंहासनावर गोब्राह्मणांचे पालनकर्ते श्रीशिवछत्रपती-महाराज औरंगजेबाचे छातीवर हिंदुसाम्राज्याची प्राणप्रतिष्ठा करते झाले! जयसिंगाला ते शरणागतत्वाचे पत्र लिहिताना, मल्लयुद्ध पूर्ण भरात असताना शत्रूला पेच मारून उलथून पाडण्यासाठीच पण त्याचे पुढे नम्र होऊन त्याचे पायाला हात घालताना बायाबापड्या मूर्खपणाच्या डौलाने नि तिरस्काराने शिवाजीवर ओरडल्या होत्या, 'थूः शरण गेला! शत्रूचे पाय धरले!' आता त्या पाय धरणाऱ्या हाताने तोच शत्रूचा पाय हिसडून टांग मारून त्याच पेचाने शत्रूस चीत करताच हरिद्वारपासून कन्याकुमारीपर्यंत हिंदु जनता टाळी देऊन गर्जली-गर्जत आहे- आणि गर्जत राहील की, 'भले वीर! खूप पेच मारला! शत्रूस चारी मुंड्या चीत केला!'

ही झाली शत्रूची गोष्ट. दुष्टांशी महाराज असे वागले. कपटनीतिपटूशी हे वर्तन झाले. पण सुष्टाशी? साधूशी? रामदास म्हणतात,

**'आचारशील विचारशील। न्यायशील धर्मशील।**
**सर्वज्ञ सुशील। जाणता राजा।।'**

की ज्याने इतक्या खटाटोपाने संपादिलेले राज्य एका कागदाच्या केवळ चिटोऱ्यावर केवळ एका शब्दाने हे राज्य 'रामाचे' म्हणून निर्देश करून दासांचे झोळीत भिक्षा घातली आणि आपण 'हिंदुधर्मासाठी फकिरी घेतली!'

आदानं हि विसर्गाय सतां वारिमुचामिव।

साध्य जर पवित्र आहे तर त्याचेसाठी गाजविलेले शौर्य नि दाखविलेली नम्रता, कलेले रण वा निघालेले शरण, ही दोन्हीही पवित्रच आहेत. जे जे साधन पवित्रतम साध्याचे सिद्धिस्तव अपरिहार्य नि अंती मनुष्यजातीस लाभकारक ठरते त्याचे अवलंबन पवित्रच होय.

हिंदुधर्माचे पुनरुज्जीवन करून स्वराज्याचा प्राणाधार जे स्वराज्य ते संपादन करणे ही इच्छा जर न्याय्य आहे, हे कृत्य जर धर्म्य आहे, हे ध्येय जर दैवी ईश्वरी संपतीचे आगर आहे, तर मग त्या ध्येयाचे सिद्धीसाठी जेव्हा शौर्याने काम होण्यासारखे असेल तेव्हा सिंहाच्या तोंडात हात घालून त्याचे दात उपटण्यास धावणारे दुर्दांत शौर्य मी प्रकट करीन; पण जेव्हा ते महाकार्य शौर्याने साधण्याचे स्थली उलट बिघडणारे आहे, तेथे मी भयंकर भुजंगास भुलवून आणणारी आपली नम्रपणाची मंजुळ पुंगी वाजवीन. ह्या ध्येयाचे पूर्णतेसाठी, देवाच्या कार्यासाठी जनतेच्या कल्याणासाठी मी केव्हा 'बळीस' अगदी दुर्बळ दिसणारी वामनमूर्ती धारण करीन, जरासंधाच्या नगराच्या महाद्वारातून विजयवाद्य वाजवीत शिरण्याचा मूर्खपणा करण्याचे स्थली छद्मवेशांत आडमार्गाने दीनासारखा प्रवेशीन, कालयवनापुढे भरघाव पळ काढीन, मुचकुंदाच्या गुहेत लपेन, भीमासारखा सैपाकी होईन, पण संधि साधताच एकाएकी उलटून रामासारखा रावणावर तुटून पडेन, नरसिंहासारखा घोर होईन, अभिमन्यूसारखा विजय पाहण्याचीही आशा न धरता मारला जाईन- पण--

व्यूही शिरेन सरसा मागे परतेन एक पदही न।

शिवरायांच्या राजनीतीचे हे सूत्र होते, म्हणूनच औरंगजेबासारख्या कपटी, बापास बाप न म्हणणाऱ्या, मुसलमानी बादशहाचे तोडीस तोड देऊन त्यांना हिंदुपदपादशाही स्थापन करता आली.

**शिवरायांच्या यशस्वी राजनीतीचे हे मर्म होते. एतदर्थच**
**कातर्यं केवला नीतीः शौर्यं श्वापदचेष्टितम्।**
**अतः सिद्धि समेताभ्यमुभाभ्यामन्वियेष सः।।**

या नीतिसूत्राचे आधाराने वागून शिवाजी स्वराज्य स्थापू शकले! शिवाजी शिवाजी होऊ शकले!!

* * *

## ‘थूः तुमच्या जिनगानीवर’

काय? आज तीनशे वर्षानंतर मला शिवाजीला, तुम्ही मराठ्यांनी जे बोलाविलेत, माझा वाढदिवस साजरा करण्याकरिता म्हणून मोठ्या गाजावाजाने जे आमंत्रिलेत ते काय माझी अशी संभावना करण्याकरिता? युद्धे, लढाया, सेना, सैनिक, धावे, स्वाऱ्या, अंतिमत्तरे, भगवे झेंडे, ताशे, ढोल केवढा गाजावाजा आणि केवढा गोंधळ तुम्ही करीत होतात-ते ऐकून मला वाटले की, तुम्ही मला जे बोलावता आहात ते अर्थात कोणता तरी महान पराक्रम करून दाखविण्यासाठीच होय. तीनशे वर्षांनी का होईना, पण माझ्या मागे माझे घालविलेले राज्य परत जिंकून ते माझ्या चरणी अर्पण करण्याकरिताच तुम्ही मला आमंत्रिले असाल- ह्या रणगर्जना आणि कोलाहल चालविला असाल!

पण पाहतो तो काय? नाटकगृहात चाललेले एखादे नाटक यापेक्षा अधिक रंगते! हे लोक सरड्यावर बसून स्वाऱ्या करीत आहेत. पिंडावर पोट भरू पाहत आहेत, जिभेचे पट्टे फिरवीत त्या पटाईत धारकऱ्यास धाकवू इच्छित आहेत, युद्धाच्या भातुकली खेळत आहेत, स्वातंत्र्य, युद्ध, कूच, स्वारी- या शब्दांचीच नव्हे तर या वाचिवीरांनी माझ्या शिवाजी या नावाची देखील इतकी विटंबना केली आहे की, त्याचा आता कोणास काडीचा देखील धाक देखील वाटत नाहीसा झाला. माझे नाव घेताच अगदी तीस पस्तीस वर्षापूर्वी देखील माझे शत्रू चमकून उठत. त्यांना वाटे शिवाजीचे नाव म्हणजे रणदेवतेचा जाज्वल्य मंत्र आहे. जर का ते महाराष्ट्रात उच्चारू दिले, जर का कोणास त्याच्या चित्राची मिरवणूक काढू दिली वा त्याचा जयजयकार करू दिला तर न जाणो महाराष्ट्र आपले गेलेले राज्य परत मिळविण्यासाठी तानाजी, बाजीसारखे शिर हातावर घेऊन शत्रूवर तुटून पडेल! म्हणून ते नाव कोणाच्याही कोनाकोपऱ्यात ऐकताच माझे शत्रू चिडून जात, भिऊन उठत; त्या वासुदेव बळवंताने माझे नाव घेतले होते, त्या चाफेकराने माझ्यावर एक कविता रचून म्हटली होती- तर केवढी खळबळ उडाली, माझे उत्सव भयंकर अपराध ठरले. माझ्या नावास उच्चारण्याची बंदी झाली. हरीच्या नावाने राक्षस चिडत तसे माझे नावाने ते चिडत. पण हाय हाय! माझ्या नावास तुमच्या करंट्या जिभेचा स्पर्श होताच त्यातील ती खरी जादू आज निघून गेलेली दिसत आहे. दगडावर ठिणगीचा जसा काही परिणाम होत नाही तसा आजकालच्या या मुर्दाड महाराष्ट्रावर माझ्या नावाचा काहीच परिणाम होईनासा झाला. पूर्वी त्यास वाटत होते महाराष्ट्र हे दारुचे कोठार; त्यावर ही शिवाजीच्या स्मृतिची ठिणगी पडणे नको; पण आता त्यांना कळून चुकले की, हे दारुचे कोठार राहिलेले नसून नाल्याची घाणेरडी दलदल झाली आहे. शिवाजीच्या जळत्या नावाने ही दलदल पेटणे तर

दूरच; पण उलट त्या नावातील जळती ठिणगी तीवर पडताच ती ठिणगीच विझण्याचा पक्का संभव. म्हणूनच हे वाचिवीरांनो, तुम्हास आता माझ्या नावाचे जयजयकार, वाटेल तितके करू देण्यात येतात. कारण माझ्या नावाने तुमच्या मुर्दाड मनात एक कर्तृत्वशील चेतना उत्पन्न होणे अशक्य झाले आहे. त्या योगे माझ्या नावाचा दाराही नाहीसा होऊन माझे शत्रुदेखील माझे नावाशी विषारी दात काढून टाकलेल्या सापाशी गंमतीने खेळावे तसे खेळत आहेत. माझ्या अपमानाची परमावधी म्हणजे ज्यांनी माझे राज्य घेतले; माझ्या सिहासनावर जे आज बसत आहेत, त्यांनीच माझा पुतळा उभारावा! -भर महाराष्ट्रात उभारावा! अगदी पुण्यास उभारावा! ज्या प्रांतात मी शाहिस्तेखानावर छापा घातला आणि अफजुल्ल्याला चिरून काढले. त्यात उभारावा आणि तसे करण्यात माझ्या शत्रूंना यत्किंचितही भिती वाटू नये!! तुम्हांवर त्याचा काही लवलेश तरी परिणाम होईल अशी धास्ती वाटू नये!!!

दगडांनो! तुम्ही माझा या शिवाजीचादेखील एक दगड करुन टाकलात! राखेत टाकलेली आहुती जशी निष्फळ होते, व्रतच्युताच्या तोंडी भैरवमंत्रही जसा निस्तेज होतो, प्रेताला बांधलेली तलवार जशी प्रेतासारखीच पडून राहते, तसा हा माझा ह्या पुण्यक्षयी, क्षयग्रस्त पुण्यास उभारलेला पुतळा दगडासारखा एक दगडच होऊन पडला आहे आणि एखाद्या साध्या दगडाची जितकी भिती वाटच्या चोरास वाटते, तितकी देखील त्या माझ्या पुतळ्याच्या दगडाची भिती त्यास वाटत नाही. कारण तुमचे हे लुळे हात, हे पंगु पाय, ही मुर्दाड मने! ह्या माझ्या दगडी पुतळ्याच्या दगडाइतका देखील उपयोग करून घेत नाहीत!!!

मग तुम्ही मला बोलाविलेत तरी का? केवळ माझी अशी विटंबना करण्यासाठी? ज्या प्रतापगडावर मी अफजुलखानाचे शिर टांगले आणि शत्रूचा दहा हजार घोडा पाडाव करुन बांधून टाकला- त्याच प्रतापगडाला अवघ्या दहा-बारा पठाणांनी लुटावे, आणि माझ्या कुलस्वामिनीच्या मूर्तीस गदागदा हलवून सोडावे आणि त्या गडाच्या आजूबाजूस पसरलेल्या हजारो मराठ्यांनी बांगड्या भरून, लुगडी नेसून परकी पोलिसांच्या पाया पडत फिरावे. 'ते बारा पठाण धरा! आमची देवी लुटली!' थू: तुमच्या जिनगानीवर!! थू: तुमच्या जिनगानीवर!!

इकडे प्रतापगडची ही अवस्था असता तुम्ही तिथे जाऊन हा त्रिशत-वार्षिक शिवोत्सव-त्या प्रकारे, माझ्या मराठ्यांना शोभेल अशा प्रकारे त्या देवीच्या अपमानाचे उट्टे काढून साजरा करावयाचा का तिकडे जुन्नरला जाऊन मला अंगाई गीते गात बसायचे! अरे, ह्या माझ्या महाराष्ट्राच्या अपमानास पाहून माझ्या अंगाची लाही लाही होत असता तुम्ही बायकांसारख्या अंगाया गाऊन का मला शांत, प्रसन्न करू शकाल! आणखी मला पराक्रम असा कोणचा दाखविलात! होय, ती जुन्नर किल्ल्यावरची दौड! वाः ज्या

किल्ल्यावर मुलूखमैदान तोफा आहेत, शत्रूंचे झेंडे झुलताहेत, मारगिऱ्यातून आगीचा मारा चालला आहे अशा शतशः किल्ल्यावर भरधाव चालून जात जिवानिशी शत्रूंचे जीव घेणारे आणि किल्ले सर करणारे हजारो वीर ज्या ग्या त्या महाराष्ट्रात पाहिले, त्या मला ह्या तुमच्या एक गोटात देखील वरून फेकण्याची गोफण ज्या किल्ल्यावर नाही त्या किल्ल्यावर नुसते दुडदुडत धावत जाण्याचा तो पराक्रम दाखविलात! अशा प्रकारे तो किल्ला सर करून- पुनः तत्क्षणीच इंग्रजांचा इंग्रजास परत देऊन मागचे पाउली मागे फिरण्यात जो उदारपणा दाखविलात,तो पाहून तर मी अगदी थक्कच झालो. पायात पैंजण घालून किल्ल्यावर दुडदुड धावत जातात तर याहूनही बहार होती! खाली येताच लाडूचे जेवण; आणि मग ती भगव्याची मिरवणूक- ती व्याख्याने- माझ्यावरील तुमच्या अलोट प्रीतीची व्याख्याने! आणि माझ्या इतिहासाच्या साधनांचे भाराभर प्रसिद्ध केलेले भारूड. बस्स, हे काय ते तुमचे पराक्रम तुम्ही मला दाखविलेत!

माझ्या देशबंधुंनो, माझे तुमच्यावर निरतिशय प्रेम आहे. ह्या माझ्या हिंदुस्थान देशासाठी आणि हिंदु जातीसाठी मी अनेकवार माझे प्राण धोक्यात घातले, जन्मच्या जन्म कष्ट काढले, म्हणूनच मला तुमचे काही चुकत असेल तर ते कडकपणे सांगण्याचा अधिकार आहे. यास्तव मी स्पष्टपणे सांगतो की, तुम्ही माझेवर प्रीती करता याचा मला मुळीच संतोष वाटत नाही. तोवर केव्हांही वाटणार नाही की, जोवर तुम्ही या माझ्या मातृभूमीच्या उद्धारार्थ आणि हिंदु जातीच्या गौरवार्थ काही मिळवीत नाही, त्याग आणि शत्रूला धाकविणारे धाडस दाखवीत नाही, पराक्रम करीत नाही आणि नुसती माझी स्तुतिस्तोत्रे गात बसता!

जे हरविलेत ते मिळविलेत का? ज्या संकटाच्या कंसाने तुम्हास बंदीत टाकले त्या संकटाचा शिरच्छेद केला आहा का? ज्या पूतनेने फसविले तिची फासळी नि फासळी विदारली आहेत का? तुम्ही दासचे दासच आहात ना? या भूमातेच्या पायात परवशतेच्या बेड्या जशाच्या तशाच आहेत ना? मग तुम्ही माझी नुसती स्तुति करीत काय बसला आहात? त्या स्तुतीसारखी माझी दुसरी विटंबना नाही! कारण ज्या भारतात मी शिवाजी जन्मलो तो भारत ज्यांच्या हातात आहे तो मजहून, माझ्या जातीहून श्रेष्ठ ठरलाच पाहिजे. जितकी माझी अधिक स्तुती कराल तितक्या पटीने आपोआपच तो आपला विजेता अधिकाधिक श्रेष्ठ ठरत जातो. रावणाला दहा तोंडे आणि वीस हात होते म्हणून जितका अधिक गौरवाल, तितक्या अधिक पटीने त्यास जिंकणारा राम अधिकतर पराक्रमी ठरणार. तेव्हा माझी खरी स्तुती करावयाची असेल तर हे भारत मुक्त करण्यासाठी, जनतेसाठी तुम्ही काय केलेत ते कळवून घेण्यास मी आलो आहे, तर तुम्ही मला शिवकालीन इतिहासाचे संशोधनात्मक भारूड घेऊन सामोरे येता! अरे, शिवकालीन इतिहास मला माहीत आहे; तुम्हाला माहीत आहे त्याहून शतपटीने मला माहीत आहे. तुम्ही तुमच्या

काली कोणता बंब वाजविलात ते मला सांगा. तुम्हा स्वतःला कालच नाही की काय? तो तुमचा काल उत्पन्न करून तो मला वाचावयास द्या. ज्याला आपल्या स्वतःचे पौरुषाने स्वतःच्या कालाचा शककर्ता होता येत नाही, तो मुर्दाड देश, ती मुर्दाड पिढी, पूर्वजांच्याच कालाचे तुणतुणे तेवढे वाजवीत बसते. करंटाच आपल्या कोट्यधीश पणजाचे नावावर आपली पत नेहमी पटवू पाहतो. आजच्या करंट्या महाराष्ट्रा, तीच स्थिती तुझी झालेली आहे! जो उठतो तो शिवकालीन म्हणून काही तरी खरडण्यातच जन्मसाफल्य मानतो. जी कादंबरी पाहावी ती 'शिवकालीन', पोवाडा 'शिवकालीन', नाटके 'शिवकालीन', पुतळा शिवकालीन इतिहास 'शिवकालीन', संशोधन 'शिवकालीन!' शिवकालीन कालावाचून दुसऱ्या कोणा-कालास शिवण्याची चोरी! प्रत्यक्ष मला शिवाजीला आणि माझ्या शिवकालीन पिढीला देखील या शिवकालीन स्मृतिचा एखाद्या शिवीसारखा राग यावा तितका तिचा अतिरेक झाला आहे!

'देवा, माझ्या महाराष्ट्राच्या हितासाठी तरी आता महाराष्ट्राला माझा विसर पडू दे. माझ्या झाल्या गेलेल्या शिवाजीच्या स्मरणात गुंतलेला तो महाराष्ट्र इतका बेशुद्ध झाला आहे की, त्याला स्वतःला देखील शुद्ध उरली नाही. मी पूर्वीचा विगत शिवाजी त्यांना इतका आवडतो आहे की, त्यांना दुसरा एखादा नवीन शिवाजी उत्पन्न व्हावा ही इच्छा देखील असह्य होते. मी, तानाजी, बाजी आणि आमचे इतर खरे खोटे लहान मोठे सवंगडी जी लहानमोठी साहसे करीत होतो, परिस्थितीशी टक्कर देऊन लाथेसरशी उलटून पाडण्याची जी पौरुषी हाव धरीत होतो, तिची वाहवा करता करता या लोकांना पुरेसं होतच नाही. पण तसेच लहान मोठे साहस, तशीच एखादी पौरुषी हाव जर ह्यांच्यातीलच एखादा धरू लागला, तर हेच लोक त्याला माथेफिरू, अत्याचारी, अराजक, वेडगळ म्हणून शिव्या हासडू लागतात. आम्ही मूठभर होतो तरी झुंजू निघालो म्हणून आमची जे लोक स्तुति करतात, तेच लोक त्यांच्यातील कोणी त्याच हेतूने झुंजूं निघताच त्यांस 'मूठभर' म्हणून वेडगळ ठरवू लागतात! जो गुण आमच्या शिवकालीन कादंबऱ्यांत 'साहस' होतो, तोच प्रस्तुत कालातील एखाद्यात दिसताच माथेफिरू अत्याचार ठरतो! आणि आमचे पाय मागे ओढणाऱ्या पण सद्धेतुक वृद्धांच्या साहसशून्य शहाणपणास जे 'शिवकालीन' वाङ्मयात दोष देतात, तेच ती साहसशून्यता यांच्या पिढीत दाखवतात नि खरे शहाणे म्हणून मिरवू शकतात. फार काय सांगावे! पण आमच्या शिवकालीन आणि राजारामीय पिढीत जे काही देशभक्त जहागिरी इनामावरच झुंजत, त्यांच्याही देशभक्तीचे यथार्थ गौरव आणि योग्य कौतुक करणारे हे लोक यांच्या पिढीत जे देशस्वातंत्र्यार्थ झुंजताना फाशीवाचून दुसऱ्या इतर कोणत्याही जहागिरीचे अमिष डोळ्यापुढे धरीत नाहीत, अशा जाज्वल्य देशवीरांनाही देशवीर म्हणावयास सिद्ध नसतात. त्यांच्यावर एक अक्षरही लिहिणे म्हणजे असभ्यपणा होय असे समजतात. आता हे मी जाणून आहे की, हा प्रभाव त्या इंडियन पिनल कोडाचा

असावा आणि जर कदाचित त्या कोडात माझी स्मृति करणे दंड्य अपराध गणला जाता, तर या शिवकालीन काळालाही त्यांच्या भीतीच्या काळोखातच तोंड खुपसून राहवे लागते आणि आमचीही मराठी वाङ्मयात तशीच एकेरी उल्लेखिलेली संभावना होती की, जशी त्या वासुदेव बळवंतांची होते! त्या जाज्वल्य देशवीरांचे एक चरित्र अलिकडेच माझे अवलोकनात आले. त्यात न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांना कित्येक ठिकाणी सन्मानार्थ बहुवचनी उल्लेखिले आहे. सार्वजनिक काकांनाही अहो जाहो म्हटले आहे. ते ठिकच आहे. तेही देशभक्त आणि त्यागी देशसेवकच होते; पण वासुदेव बळवंत फडक्यांना प्रत्यक्ष त्यांच्या चरित्रातच येथून तेथून एकेरी अरे तुरेने संबोधिले आहे. देशभक्तीत आणि देशसेवेसाठी केलेल्या त्यागात फडके त्यांच्या पिढीत इतके कमी प्रतीचे ठरले! कारण त्यांनी देशहितार्थ आयुष्याच्या सायंकाळची शिळोप्याची वेळ किंवा पगाराचा एक लक्षांश तेवढाच त्याग करण्याचा सभ्यपणा न करता आयुष्याचे आयुष्य आणि सर्वस्वचे सर्वस्व त्या देशासाठी त्यागाचे वेदीवर बळी देण्याचा हलकटपणा केला म्हणून त्यांना दीड दमडीच्या खर्डेघाशांनी देखील असे तुरे करावी!! वासुदेव बळवंतांचे साहस अयशस्वी ठरले; पण यश हेच जर अहो जाहोचे एकमात्र गमक असेल, तर माझे शिवाजीचे तरी काय? अफजुलखानाच्या कैचीत मी सापडलो तिथे म्हणे केवळ योगायोग होता. जर का मी मरतो, तर ह्याच जात्यावरच्या ओव्या, गाणाऱ्या बाया त्या सगळ्या डावाला मूर्खपणाची पराकाष्ठा म्हणत्या-म्हणत्या, आपण होऊन गाढवासारखा अफझुल्ल्याच्या तंबूत गेला! आणि शाहिस्तेखानाच्या बंगल्यात! रतीभर चाहूल अवेळी होती, एक ढेकूण भलत्याच वेळी त्या सैंपाक घरातील मुसलमानांपैकी कोणास डसून जागृत करता- मी जीवंत धरलाच जातो! आणि दिल्लीस त्या पेटाऱ्यात? ते मुसलमान मंत्री तंबाखूची पिचकारी टाकण्यासाठी जरी पुढे सरकते नि सहज जरा नुसते त्या पेटाऱ्यात डोकावते, एखाद्या उंदरासारखा सापडलो असतो! केवळ योगायोग म्हणून निभावलो! पण जर त्याच्या उलट घडते तर हेच 'शिवकालीन' आजचे भाट, यशाचे भोपे, मजवर 'माथेफिरू', 'गोंधळ्या', 'उल्लू' म्हणून भुंकत सुटते! म्हणून मला या तोंडपुज्या 'शिवकालीनांचा' अगदी तिटकारा म्हणून येत आहे. कारण यांना पराक्रमाची पारख नाही. ते केवळ यशाचे मिंधे आहेत. त्यांना हेतूची, त्यागाची आणि उत्कटतेची ओळख नाही. हे केवळ घुगऱ्या तिकडे उदो उदो करणारे आहेत! नाहीतर आमच्या पिढीतील वैयक्तिक पराक्रमाच्या तोडीस तोड देणारे पराक्रम आणि तेही क्वचित आमच्या पिढीहून एक रति अधिकच निर्भेळ अशा जाज्वल्य देशभक्तीने उत्स्फूर्त झालेले- यांच्या ह्या स्वतःच्या पिढीत यांच्या डोळ्यासमोर घडत असताना यांना असले देशवीरत्व, ते अजून अयशस्वी होत आहे, म्हणूनच काय ते हायकोर्ट जज्जपणापेक्षा किंवा वकीलपणापेक्षा सापेक्षतः असभ्य आणि हलकटपणाचे वाटते ना? दुर्लक्षार्ह भासते ना? आणि तेच गुण केवळ यशस्वी झाले म्हणून 'शिवकालीन पिढीत' वर्णनीय ठरले ना? यश!

ह्यांना एक सैनिक पडला न पडला की, लढाई जिंकली गेली पाहिजे; बीज टाकले न टाकले की, त्याचा आंबा होऊन पाडास लागून अगदी आढीत पिकून यांच्या ओठाशी आला पाहिजे. नाही तर ते बीज व्यर्थ गेले, तो सैनिक माथेफिरूसारखा व्यर्थ मेला! म्हणून देवा, या माझ्या 'शिवकालीन' स्तुतिपाठांपासून माझे रक्षण कर. माझ्या राष्ट्राच्या हितासाठीच मी शिवाजी अशी विनंती करतो की, महाराष्ट्रास माझा थोडा विसर पडू दे. मी मागचा शिवाजी त्यांना इतका आवडलो आहे की, नवीन शिवाजी उत्पन्न होण्याची इच्छा देखील त्यांना आता असह्य होते!

तुम्ही म्हणाल की, एका ओसाड किल्ल्यावर दुडदुड धावून येणे, लाडूच्या जेवणावळी झोडणे आणि माझ्या इतिहासाच्या संशोधनाचे भारूडाचा मला नैवेद्य अर्पिणे यापलीकडे या परिस्थितीत अधिक काही पराक्रम करून दाखविणे तुम्हास अशक्य होते- तर मी म्हणतो जोवर तुमच्या मुर्दाडपणाचे प्रतिबिंब असणारी ही परिस्थिती आहे तोवर यापुढे तुम्ही मला बोलावण्याचा मुर्खपणा तरी करू नये. हा तुमचा कार्यक्रम ज्यांच्या उत्सवाला शोभेल अशा कोणाचा, उदाहरणार्थ त्या पळपुट्या दुसऱ्या बाजीरावाचा उत्सव करीत जा. त्याला किल्ल्यावर हल्ला करण्याची धमक नव्हती- त्याला तुमच्या या दुडदुड धावत जाण्यायेण्याचे देखील आश्चर्य वाटेल. परक्यांचे झेंडे आपल्या राजवाड्यावर उडत असताही लाडूंचा नैवेद्य तो खाईल. मी एका राज्यारोहणाच्या दिवशी तेवढा लाडूस शिवतो. तो दिवस येईल तेव्हा मला बोलवा! सिंहाला आमंत्रण देऊन त्याच्या पानात हिरव्या गवताच्या पेंढ्या सोडण्याचा मूर्खपणा तरी पदरी बांधून घेऊ नका. ते अतिथ्य कोणा बैलोबाचा उत्सव चालू करून त्याचे वाट्यासाठी राखून ठेवा. अरे मी जर माझ्यापूर्वी होऊन गेलेल्या विजयनगरच्या हरिहर बुक्कांचे नुसते शतसांवत्सरिक उत्सव करून लाडू झोडतो किंवा त्यांच्या जन्मतिथींचा आणि लग्नतिथींच्या आणि मृत्युतिथींचा जंत्र्या जुळविण्यातच जीवनास कृतार्थ मानतो तर मी हिंदुपदपादशाही स्थापू शकून त्या माझ्या पूर्वजांच्या ऋणातून मुक्त होतो का? मीही रामायण ऐके. पण आजीबाईसारखे तांदूळ घेऊन जन्मभर तेच नुसते ऐकत बसत नसे किंवा मेलेल्या रावणासच प्रतिवर्षी नाटकानाटकातून, पोवाड्यापोवाड्यातून मारीत बसत नसे. तर मी माझ्या वेळच्या जिवंत रावणास, रामायण ऐकताच मारू धावे. मी अफजुल्ल्यास मारले, शाहिस्त्यास चिरले, पाच पादशाह्या धुळीस मिळविल्या! रामायण ऐकताच रामासारखे पराक्रम केले.नुसत्या रावणाच्या दहा तोंडाच्या वीस मिशांस केस किती होते आणि मारुतीच्या उड्डाणाच्या वेळी जी रेती वर उसळली तिच्यात कण किती उसळावे त्याचे ऐतिहासिक संशोधन करीत बसण्यातच रामायणाच्या वाचनाचे उद्यापन केले नाही. तर हनुमानाचे उड्डाणाची कथा ऐकताच जी तुम्हा अकर्मण्य भ्याडास, या माझ्या हिंदु जातीच्या आणि महाराष्ट्राच्या पोटी जन्मलेल्या पंगूहून पंगु पिढीस सदा भेडसावते, त्या परिस्थितीस, पायाखाली हनुमानाने जंबूमालीस तुडविले तसे

तुडवून दहा शतकांच्या राष्ट्रीय अवनतीच्या भयंकर गर्तेच्या समुद्रावरून उडी घेतली नि परदास्याची लंका जाळून भस्म केली.

तसे काही करा तर तुम्ही माझे नि मी तुमचा! अरे, माझे नाव गल्लोगल्ली गाणाऱ्या तुम्हा मुर्दाड महाराष्ट्रीयांपेक्षा आज जो माझे उत्सव बित्सव कधी फारसे करीत नाही तो बंगाल नि तो पंजाब मला तुमच्याहून फार जवळ वाटत आहे. कारण माझ्या हिंदु जातीच्या उद्धारार्थ माझ्या सैनिकाला शोभेल असे काही तरी साहस ते मधून मधून तरी करीत आहेत. जो माझ्या या कुलाचा, वंशाचा उद्धार करण्यासाठी संकटावर चाल करून जाऊन त्याचा शिरच्छेद करतो तो माझा मुलगा. मग त्यास माझी नक्की जन्मतिथी कोणती ते जरी पाठ नसले तरी चिंता नाही. पण जो माझ्या घरची इकडची काडी तिकडे करीत नाही, तर चोर घरात वावरत असता तोंडावर बुरखा ओढून 'माझे बाबा, माझे बाबा!' 'माझा शिवाजी, माझा शिवाजी' म्हणून नुसती माझीच माळ जपत बसतो तो माझा मुलगा नव्हे. तो पोटी आलेला जंत होय!

मी विचारतो, माझे राज्य कुठे आहे? माझा मुकूट कोठे आहे? हे आम्हा भारतीयांचे आकाश, ही भूमी, हा समुद्र- यांवर स्वामित्व कोणाचे आहे? का आहे? माझ्या अंगाची लाही लाही होत आहे! विचारू तरी किती, कसे?- या प्रश्नांची, विचारलेल्यांची आणि न विचारलेल्यांची उत्तरे द्या. परिस्थिती बदलली असेल, तर माझ्या मशालीने नसले तर विजेच्या दिव्यांच्या प्रकाशाने नवीन मार्ग काढा, नवीन योजा. मी देखील काही रामांच्याच धनुष्यबाणांनी लढलो नाही, मीही साधने बदललीच पण माझ्या काळचा रावण मारला! तुम्ही साधने बदला. नवीन वैध पवित्रे टाका. काय वाटेल ते करा- पण झुंज जिंका! आणि जोपर्यंत तुम्हास जसे काही करता येत नाही, वरील प्रश्नास उत्तर देववत नाही, तुम्ही एक वा अनेक शिवाजी उत्पन्न करीत नाही, तोवर महाराष्ट्रीयांनो, तुम्हास माझी शिवाजीचीच शपथ आहे की, माझे पोवाडे तुम्ही गाऊ नका, माझे नाव पुन्हा 'मी तुमचा' म्हणून घेऊ नका, तुमच्यासारख्यांनी नव्हे तर माझ्यासारख्या

**शूरमर्दाचा पोवाडा।। शूर मर्दाने गावा।।**

**अनुस्मरणाने नव्हे, तर यथाकाल अनुसरणाने गावा.**

- दिनांक ५ एप्रिल १९३०.

* * *

# अटकेवर हिंदु विजयाचा भगवा झेंडा

(१)

हिंदुंच्या अर्वाचीन इतिहासात, म्हणजे कमीत कमी गेल्या एक हजार वर्षांत हिंदुमात्रास अत्यंत मंगलकारक, अत्यंत अभिमानार्ह आणि अत्यंत गौरवास्पद असा जर कोणता दिवस उगवला असेल, तर तो तो होय की, ज्या दिवशी हिंदूंच्या भगव्या झेंड्यास झुंजवीत नेऊन, मुसलमानांच्या बादशाहीचे तुकड्यामागून तुकडे उडवीत, हिंदुच्या साम्राज्याचे प्रांतामागून प्रांत इस्लामी राज्यसत्तेच्या गुर्मीच्या छाटून टाकलेल्या पंज्यांतून विमुक्त करीत, हिंदुच्या विजयी सैन्यांनी त्यास इ.स. १७५८ च्या एप्रिल-मेच्या संधीस अटकेवर रोविले!

एकदंरीत पाहता दाहिर राजाच्या पराभवापासून म्हणजे आठव्या शतकापासून हिंदूंच्या पडत्या काळास आरंभ झाला. अफगाणिस्थानापासून तो बंगालच्या शेवटच्या नगरापर्यंत आणि काश्मीरपासून तो रामेश्वरापर्यंत हिंदूंची सारखी पिछेहाट होत होत सर्व हिंदूंची राजसत्ता मुसलमानांच्या हाती गेली. जर या पराभवाचे उट्टे हिंदूंना केव्हाही काढता आले नसते तर हिंदू जातीस आणि हिंदु संस्कृतिस जगात तोंड काढण्यास जागा उरली नसती. जेथे तेथे सारखी हिदुंचीच हार होत आली होती. त्यामुळे मुसलमानांसच नव्हे तर उभ्या जगास सहजच असे वाटू लागले असते की, हे हिंदू स्वभावतःच दुसऱ्यांचे दास होऊन राहण्यास योग्य आहेत. हिंदू संस्कृती ही मनुष्यमात्रास शेळपट, घरघालू, भित्रा आणि निर्जिव करणारी आहे. हिंदू हा जिवंत कलहात मुसलमान किवा पोर्तुगीज किंवा इंग्रज यांच्यापुढे टिकाव धरू शकण्यास कधीही समर्थ होणारा नसल्यामुळे, सृष्टीच्या निर्दय पण कार्यक्षम नियमाप्रमाणे ते हिंदू राष्ट्र राष्ट्रांच्या झुंजीत मेलेच पाहिजे. मुसलमान तर इतकेच म्हणून थांबेनात. त्यांचे सहस्त्रावधी मुल्ला आणि मौलवी मुसलमानांनी हिंदूवर मिळविलेल्या अखंड जयाकडे बोट दाखवून सर्व जगास सांगू लागले की, ‘हे पहा! हे हिंदू मुसलमानांपुढे जे गोगलगाय होऊन जातात, ते काही त्यांच्यात जूट नाही म्हणून, मुसलमानांवर ते भोळसटपणे विश्वास टाकतात म्हणून, त्यांचे सैन्य-संघटन ढिले आहे म्हणून किंवा त्यांच्यात आत्मनाशक दुष्ट रुढी शिरल्या आहेत म्हणून नव्हे तर ह्या आनुषंगिक दोषांपेक्षा त्यांच्या प्रत्यक्ष मूलप्रकृतीतच अनुस्यूत असलेल्या न्यूनांमुळेच होय. हिंदु सामरिक कूटनीतीत अक्षम, फूट पडलेला, असंघटित आहे, म्हणूनच तो मुसलमानांच्या पुढे गोगलगाय झाला असे नव्हे तर हिंदू, हिंदू आहे म्हणूनच तो मुसलमानांपुढे हतबल ठरतो. आणि हिंदू, हिंदू आहे तोवर तो तसाच ठरणार! हिंदू

मूर्तिपूजक आहे-मुसलमान मूर्तिभंजक आहे. हिंदू हरला; मुसलमान जिकला. अर्थात् मूर्तिपूजक हा हरावयाचाच आणि मूर्तिभंजक हा जिंकावयाचाच! हिंदूंचा धर्म खोटा. हिंदूंचे तत्वज्ञान फोल, हिंदूचे रक्त निःसत्व म्हणून हिंदूंकडे देवाने स्वतःच पाठ फिरविली आहे आणि त्यांना तो जय देत नाही. अहिंदूंना देव जय देतो, यावरूनच अहिंदूंचा धर्म खरा; त्यांचे तत्वज्ञान सत्य; त्यांचे रक्त जिवंत नि जिवंत राहण्यास योग्य! असा कोटिक्रम मुल्ला आणि मौलवी सरसकट करू लागले होते. इतकेच नव्हे, तर त्यांच्या त्या पुष्पित वागविग्वादाचा पगडा पडून शेकडो हिंदुचा देखील बुद्धिभ्रंश होत चालला. मुसलमानांच्या प्रत्येक समरविजयाबरोबर हिंदूंचा एकेक राजमुकूट चूर्ण होत असे. त्यांच्या संस्कृतिच्या आत्मविश्वासाचा आणि हिंदुत्वाच्या जीवनाचाही एकेक धागा तुटत जाई. जर हीच स्थिती तशीच राहती, तर रणक्षेत्रावर हिंदूस पराजयामागून पराजयच येत राहते, तर अहिंदूच काय पण सृष्टीदेखील तिच्या निर्घृण, निष्ठुर स्वभावानुरुप तशा अकर्मण्य आणि दुर्बल राष्ट्राकडे पाठ फिरविती आणि त्याच्या भाळी 'जीवनकलहात मरण्यासच योग्य' अशी मुद्रा ठोकून त्यास काळाचे जबड्यात ढकलून देती! आज हे जगत् हिंदूशून्य होऊन राहते. हा देश स्वतःस हिंदूंचे हिंदुस्थान न म्हणविता हिंदूचे कबरस्थान म्हणविता! कारण कुणी काहीही म्हटले तरी ज्यास झगड्यात झगडता येत नाही आणि जिंकता येत नाही त्यास जगात जगता येत नाही- येणार नाही! हा सृष्टीचा निष्ठुर नियम आहे. दुर्बलांनी पंगु इच्छेच्या गुलाबांच्या फुलांमध्ये 'झगड्यात जो जिंकील तो जीवनात जगेल!' हा निष्ठुर नियम खोदलेली ती निसर्गाची तरवार कितीही झाकली तरी तिची जीवघेणी धार आणि त्या निसर्गाची ती 'red in tooth and claw' असणारी रक्ताळ वाघनखे ही काही बोथट होत नाहीत! लपूही शकत नाहीत!

'शेवटी न्यायाचा विजय होईलच! भगवान करील ते खरे!', 'भजन करीत बसू या म्हणजे झाले!' अशा दुर्बलांच्या पंगु इच्छांच्या गुलाबांत ती निसर्गाची वाघनखे झाकू पाहणाऱ्या अकर्मण्य हिंदूंच्याच पिढ्या जर वाढत जात्या तर, जर रणक्षेत्रात हिंदूंना जिंकताच येते ना तर, हिंदूंना जगताही येते ना, त्यांचा वेदान्त त्यांच्या वेदांचा खरोखरच अंत करणारा ठरला असता, जर त्या वेदांस धनुर्वेदाचा पाठिंबा देणारा शिवाजी इ.स. १६२७त जन्मास न येता!

पण हिंदुंच्या सुदैवाने तो शिवाजी जन्मास आला. इ.स. ७२७ पासून हिंदुंच्या पराक्रमास लागलेले खग्रास ग्रहण बरोबर ९०० वर्षे टिकले! पण ९०० वर्षे पराभवाच्या राहूच्या पोटात खिचपत पडला, तरी तो हिंदुंचा पराक्रम पचून गेला नाही आणि अगदी पिचूनही गेला नाही! १६२७ मध्ये शिवाजी जन्मल्याघटीस त्या ग्रहणाच्या मोक्षकालाचा पहिला विपल जन्मला. तो त्या वेळेस कोणास कळला नाही. केवळ इतिहासाच्या उलट्या दुर्बिणीतून आज तो दिसू लागला आहे. शिवाजीने हिंदूंच्या स्वतंत्र साम्राज्याची संस्थापना

